**मंगरुळपीर, जिल्हा वाशिम येथे स्थापन करण्यात आलेल्या जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर या जोडन्यायालयांऐवजी जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर मंगरुळपीर ही दोन नियमित न्यायालये कार्यरत करणे आणि या न्यायालयांसाठी पद निर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत ................**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीआरसी २०१७/ प्र.क्र.३१६/का.१२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०९ फेब्रुवारी, २०२२

वाचा -

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः पदनि २५१२/प्र.क्र.१५७/का.१२, दिनांक २७ जानेवारी, २०१५
२ शासन निर्णय विधि व न्याय विभाग, क्रमांक कंत्राटी २०१६/प्र.क्र.१९४/का.१२, दिनांक २३ फेब्रुवारी, २०१७
३ प्रबंधक (निरीक्षणे १), मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक बी (डब्ल्यू) ए १२१५ of १९८१/९८३/१४७४१, दिनांक १८ एप्रिल, २०१८.
४ प्रबंधक (निरीक्षणे १), मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक बी (डब्ल्यू) ए १२१५ of १९८१/२९४/५०५४, दिनांक १६ फेब्रुवारी, २०२१

प्रस्तावना -

मंगरुळपीर, जिल्हा वाशिम येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश यांचे न्यायालय आणि दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर यांचे न्यायालय अशी दोन जोड न्यायालये दिनांक २७.१०.२०१३ पासून अस्तित्वात आहेत. मात्र, या जोड न्यायालयांसाठी न्यायाधिश तसेच, कर्मचा-यांची पदे निर्माण करण्यात आलेली नव्हती. सध्या ज्या न्यायाधिशांची नेमणूक वाशिम येथे करण्यात आली आहे, त्यांनाच त्यांचे स्वत:चे कर्मचा-यांसह मंगरुळपीर येथे १५ दिवस जाऊन कामकाज करावे लागत आहे. सदर बाब प्रलंबित दाव्यांच्या संख्येसह विचारात घेऊन मा.उच्च न्यायालय मुंबई यांच्या स्तरावर गठीत The Establishment of Courts Committee या समितीने मंगरुळपीर, जिल्हा वाशिम येथे अस्तित्वात असलेल्या जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर या जोड न्यायालयांऐवजी जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय मंगरुळपीर आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर मंगरुळपीर ही नियमित न्यायालये स्थापन करण्यास शासनास शिफारस केली आहे. त्या अनुषंगाने

मंगरुळपीर, जिल्हा वाशिम येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश यांचे जोडन्यायालय आणि दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर यांचे जोडन्यायालय याऐवजी नियमितरित्या जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश यांचे न्यायालय आणि दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर यांचे न्यायालय स्थापन करण्याची व त्याकरीता आवश्यक पदनिर्मितीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे:

**शासन निर्णय -**

मंगरुळपीर, जिल्हा वाशिम येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश यांचे न्यायालय आणि दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर यांचे अस्तित्वातील जोड न्यायालयाऐवजी नियमित स्वरुपात जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर यांचे न्यायालय स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, या न्यायालयांसाठी खाली दर्शविल्याप्रमाणे पदे निर्माण करण्यास आणि काल्पनिक पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :

**जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय मंगरुळपीर**

| अ.क्र. | पदनाम | पदाची वेतनश्रेणी | नव्याने निर्माण केलेली पदे | नव्याने निर्माण केलेली काल्पनिक पदे |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश | Pay in Judiciary Services | १ | -- |
| २ | अधिक्षक | एस १६ - ४४९००-१४२४०० | १ | -- |
| ३ | लघुलेखक ग्रेड १ | एस १५ - ४१८००-१३२३०० | १ | -- |
| ४ | वरिष्ठ लिपिक | एस ८ - २५५००-८११०० | ४ | -- |
| ५ | कनिष्ठ लिपिक | एस ६ - १९९००-६३२०० | ९ | -- |
| ६ | बेलिफ | एस ६ - १९९००-६३२०० | ३ | -- |
| ७ | पुस्तक बांधणीकार | एस ५ - १८०००-५६९०० | १ | -- |
| ८ | शिपाई | एस १- १५०००-४७६०० | २ | -- |
| ९ | पहारेकरी / सुरक्षारक्षक | एस १ - १५०००-४७६०० बाह्ययंत्रणेद्वारे | -- | १ |
| १० | सफाईगार | एस १ - १५०००-४७६०० बाह्ययंत्रणेद्वारे | -- | १ |
| | एकूण | | २२ | २ |

### दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर मंगरुळपीर

| अ.क्र. | पदनाम | पदाची वेतनश्रेणी | नव्याने निर्माण केलेली पदे | नव्याने निर्माण केलेली काल्पनिक पदे |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर | Pay in Judiciary Services | १ | -- |
| २ | अधिक्षक | एस १६ - ४४९००-१४२४०० | १ | -- |
| ३ | सहायक अधिक्षक | एस १५ - ४१८००-१३२३०० | २ | |
| ४ | लघुलेखक ग्रेड २ | एस १४ - ३८६००-१२२८०० | १ | -- |
| ५ | वरिष्ठ लिपिक | एस ८ - २५५००-८११०० | २ | -- |
| ६ | कनिष्ठ लिपिक | एस ६ - १९९००-६३२०० | ८ | -- |
| ७ | बेलिफ | एस ६ - १९९००-६३२०० | ५ | -- |
| ८ | शिपाई | एस १- १५०००-४७६०० | २ | -- |
| ९ | पहारेकरी / सुरक्षारक्षक | एस १ - १५०००-४७६०० बाह्ययंत्रणेद्वारे | -- | १ |
| १० | सफाईगार | एस १ - १५०००-४७६०० बाह्ययंत्रणेद्वारे | -- | १ |
| | एकूण | | २२ | २ |

२. सफाईगार, पहारेकरी / सुरक्षारक्षक या पदांची कामे आवश्यकतेनुसार बाह्ययंत्रणेद्वारे करुन घेण्यात यावी. बाह्ययंत्रणेद्वारे कामे करुन घेताना वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांचे अनुपालन करण्यात यावे.

३. उपरोक्त नमूद पदे ही भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दिनांक २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत असून सदर अस्थायी पदांना दिनांक २८ फेब्रुवारी, २०२२ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

४. यासाठी होणारा खर्च संबंधित आर्थिक वर्षात निधिची तरतुद करुन "मागणी क्रमांक जे १, २०१४-न्यायदान (००) (१०५) दिवाणी व सत्र न्यायालये (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश (२०१४ ०१७२) दत्तमत" या लेखाशीर्षाखालील उद्दीष्टांसाठी अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५०/आपुक, दिनांक०६ जुलै, २०२१ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०९१४३४०९१६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHAGYASHREE
RAJENDRA BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2022.02.09 14:38:30 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई,
४. मा.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
५. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६. मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई,
७. सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,
९. संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
१०.प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,
११.सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालये,
१२.सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, उत्तन / नागपूर,
१३.महालेखापाल १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई,
१४.महालेखापाल २, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१७.दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर मंगरुळपीर, जिल्हा वाशिम,

१८. दिवाणी न्यायालय कनिष्ठ स्तर मंगरुळपीर, जिल्हा वाशिम,

१९.जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम,

२०.उप जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम,

२१. वित्त विभाग, व्यय ५ / आ.पु.क. मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२२.विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने

२३.निवडनस्ती (का.१२)